अकोला जिल्ह्यातील अकोट येथे स्थापन करण्यात आलेल्या दिवाणी न्यायाधिश (वरिष्ठ स्तर) या न्यायालयासाठी निधिबाबत ..

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पुरमा २०१८/प्र.क्र.१४१/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ५ सप्टेंबर, २०१८

**वाचा –**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग, क्रमांकः सीआरसी ११०७/प्र.क्र.२०७/का.१२, दिनांक २५.०५.२०१८

२ शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः पुरक २०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दिनांक २७.०७.२०१८

**प्रस्तावना –**

मा.उच्च न्यायालयाच्या प्रस्तावानुसार अकोला जिल्ह्यातील अकोट येथे दिवाणी न्यायाधिश (वरिष्ठ स्तर) न्यायालय स्थापन करण्यास व त्यासाठी पद निर्मिती करण्यास शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक सीआरसी ११०७/प्र.क्र.२०७/का.१२, दिनांक २५ मे, २०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये निधि उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे नमूद केले होते. त्यानुसार या न्यायालयासाठी जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये विधानमंडळास सादर करण्यात आलेली लाक्षणिक पुरवणी मागणी मंजूर झाली असल्याने या न्यायालयासाठी निधि उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

अकोला जिल्ह्यातील अकोट येथे स्थापन केलेल्या दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर या न्यायालयाकरीता खालीलप्रमाणे लाक्षणिक पुरवणी मागणी विधानमंडळाने मंजूर केलेली आहे :-

| अ.क्र. | उद्दीष्ट | रक्कम रुपयांत |
|---|---|---|
| १ | ०१-वेतन | १,००० |
| २ | ०६-दूरध्वनी, वीज व पाणी | १,००० |
| ३ | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | १,००० |
| ४ | १३-कार्यालयीन खर्च | १,००० |
| ५ | १४-भाडेपट्टी व कर | १,००० |
| ६ | १७-संगणक | १,००० |
| | एकूण | ६,००० |

२. सदर लाक्षणिक पुरवणी मागणी, "मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, १०५, दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (अनिवार्य) (२०१४ ०१७२)" या लेखाशीर्षाखाली मंजूर झालेली आहे. त्यानुसार सदर लाक्षणिक पुरवणी मागणीचा उपरोक्त तक्त्यातील नमूद सहा उद्दीष्टांकरीता मंजूर झालेला रुपये ६,०००/- (रुपये सहा हजार फक्त) इतका निधि नियंत्रक अधिकारी, प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश अकोला जे -००१० यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे. सदर न्यायालयासाठी आवश्यक तो खर्च उपरोक्त नमूद लेखाशीर्षाखालील सन २०१८-१९ करीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६७८/२०१८/व्यय-५, दिनांक १६.०८.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०५१६००२५८९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2018.09.05 16:04:41 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.प्रबंधक (निरीक्षणे-१), उच्च न्यायालय मुंबई (पत्राने)
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, अकोला,
३. दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर / कनिष्ठ स्तर अकोट, जिल्हा अकोला,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला,
६. वित्त विभाग, कार्यासन व्यय-५ / अर्थ ११, मंत्रालय, मुंबई
७. विधि व न्याय विभाग कार्यासन २३ व २४, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (का.१२)